राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अतंर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) घटकाच्या सन २०१५-१६ च्या वार्षिक कृती आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शाशेअ-२०१५/प्र.क्र.३२७/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

तारीख: ५ सप्टेंबर, २०१५

**वाचा**

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.

२) केंद्र शासनाचे पत्र क्र. १-७/२०१४-RFS-III दिनांक ७ ऑगस्ट, २०१५

३) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पूणे, यांचे पत्र क्र. जा.क्र. कृआ/राशाशेअ/कोक्षेवि/प्र.मा./३२९/२०१५, दिनांक १३ ऑगस्ट, २०१५

**प्रस्तावना —**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राज्यात कोरडवाहु शाश्वत शेती विकास कार्यक्रम राबविण्यात येत होता. सन २०१४-१५ पासून केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत योजनांची पुर्नरचना केली असून काही योजना एकत्रित करुन अभियानांतर्गत राबविण्याचे निश्चित केले आहे. सदर पुनर्रचनेमध्ये राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन अभियान (NMMI), राष्ट्रीय सेंद्रीय शेती प्रकल्प (NPOF), राष्ट्रीय मृदा आरोग्य व सुपिकता व्यवस्थापन प्रकल्प (NPMSH&F) आणि कोरडवाहु शाश्वत शेती विकास कार्यक्रम (RADP) या सर्व योजनांचा समावेश राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानामध्ये केला आहे. त्यानूसार कोरडवाहू शाश्वत शेती विकास कार्यक्रम सदर अभियानामध्ये कोरडवाहु क्षेत्र विकास [Rainfed Area Development (RAD)] घटक म्हणून राबविण्यात येत आहे.

सन २०१४-१५ मध्ये सदर घटकासाठी केंद्र हिश्श्याचे प्रमाण १००% एवढे होते. केंद्र शासनाने सन २०१५-१६ मध्ये सदर कार्यक्रमासाठी केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ५०:५० राहील, असे कळविलेले आहे व त्यानुसार संदर्भाधीन अनुक्रमांक २ येथील पत्रान्वये सन २०१५-१६ या वर्षासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु.३०.२४ कोटी व राज्य हिश्श्यापोटी रु.३०.२४ कोटी अशा एकूण रु.६०.४८ कोटीच्या कार्यक्रमास मान्यता कळविलेली आहे. सदर कार्यक्रम राबविण्यासाठी राज्य शासनाची प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन निर्णय

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रम सन २०१५-१६ मध्ये राज्यात १८० क्लस्टरमध्ये ९५४० हेक्टरसाठी राबविण्यास केंद्र हिश्श्यापोटी रु.३०.२४ कोटी व राज्य हिश्श्यापोटी रु.३०.२४ कोटी अशा एकूण रु.६०.४८ कोटी एवढ्या रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. ज्या शेतकऱ्यांच्या नावाने मालकी हक्काचा ७/१२ व ८-अ उतारा आहे असाच शेतकरी सदर योजनेचा लाभ घेण्यास पात्र राहिल.

३. सदर योजनेंतर्गत २ हेक्टर क्षेत्र मर्यादेपर्यंत रु.१.०० लाख रकमेच्या मर्यादेत एका कुटुंबास अनुदान अनुज्ञेय राहिल, तथापि, सामूहीक शेततळे,प्रक्रीया युनिट, पॉली हाऊस या घटकांना सदरच्या अनुदान मर्यादेतून वगळण्यात आले आहे

४. सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या क्षेत्रांची यादी आयुक्तालय स्तरावर प्रसिद्ध करण्यात यावी.

५. क्षेत्राची निवड झाल्यानंतर योजनेची माहिती त्या क्षेत्रातील सर्व शेतकऱ्यांपर्यंत पोहचविण्यासाठी व्यापक प्रमाणावर प्रसिद्धी देण्यात यावी. त्यासाठी ग्रामपंचायत, गांवातील हॉटेल्स, व मोक्याच्या जागा या ठिकाणी भितीपत्रके लावण्यात यावीत. सदर भित्ती पत्रकांमध्ये अर्ज स्विकारण्याचा कालावधी, अर्जासोबत जोडावयाची कागदपत्रे, अर्ज स्विकारणारा अधिकारी याबाबींचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

६. अर्जदाराने अर्ज केल्यानंतर त्याला अर्जाची पोच देण्यात यावी व सदर पोचवर अर्जाचा प्राथम्यक्रम नमुद करण्यात यावा.

७. अर्जामध्ये काही त्रूटी असतील तरी अर्ज स्विकारण्यात यावा व सदर त्रूटीची पूर्तता ७ दिवसांच्या कालावधीमध्ये करण्याबाबत व विहीत कालावधीत सदर त्रूटींची पूर्तता करण्यात आली नाही तर अर्ज अपात्र ठरविण्यात येईल, असे अर्जदारास अर्ज स्विकारते वेळीच लेखी देण्यात यावे.

८. पात्र लाभार्थी जाहिर करण्याकरीता तालुका कृषि अधिकारी यांनी लाभार्थ्याची यादी अर्ज स्विकारण्याचा कालावधी संपल्याच्या १० दिवसानंतर उपविभागीय कृषि अधिकारी यांच्या मार्फत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांच्याकडे पाठवावी.

९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी ५ दिवसांच्या कालावधीत पात्र/अपात्र लाभार्थ्यांची यादी जाहिर करावी.

१०. मंजूर कार्यक्रमानूसार जरी पात्र लाभार्थ्यांची निवड करण्यात आली असली तरी प्रत्यक्ष उपलब्ध अनुदानाच्या मर्यादेतच योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी.

११. योजनेची अंमलबजावणी प्राथम्य क्रमानुसार (First Come First Serve) या तत्वावर करण्यात यावी.

१२. मुल्यवर्धित शेती अतंर्गत द्यावयाच्या अनुदानाच्या घटकांची १००% टक्के तपासणी तालुका कृषि अधिकारी व मंडळ कृषि अधिकारी यांनी केल्यानंतरच प्रत्यक्ष अनुदानाची अदायगी करण्यात यावी.

१३. मुल्यवर्धित शेती अंतर्गत अनुदान अदा करावयाच्या किमान ५% लाभार्थ्यांची पुनर्पडताळणी (Cross Verification) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी करावे.

१४. अनुदानाचा धनादेश लाभार्थ्यां मार्फत संबंधित पुरवठादारास/कंत्राटदारास देण्यात यावा.

१५. सदर कार्यक्रमाची अंमलबजावणी करताना केंद्र शासनाच्या संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील मार्गदर्शक सुचनांचे तसेच खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

I. एकात्मिक शेती पद्धती विकास हे प्रमुख उद्दिष्ट समोर ठेऊन सलग क्षेत्रात (Cluster Mode) कार्यक्रमाची अमंलबजावणी करण्यात यावी.

II. कार्यक्रमातील मंजूर घटकांची अमंलबजावणी करताना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनान्वये ठरवून देण्यात आलेल्या घटक निहाय खर्च, अनुदानाचे प्रमाण आणि इतर अवलंबावयाची कार्यपद्धती याचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

III. शेती पद्धती मॉडेल (Farming System Model) च्या आधारावर सलग क्षेत्राची निवड आणि सविस्तर प्रकल्प आराखडा तयार करण्यात यावा .

IV. सविस्तर प्रकल्प आराखड्यामध्ये गावे, ब्लॉक, जिल्हे व लाभार्थ्यांची संख्या व नावे यांचा उल्लेख करण्यात यावा. सदरची माहिती राज्य शासनाच्या डिजिटल मॅपमध्ये सलग क्षेत्राच्या डिजिटल स्थानासह (Digital Location) दर्शविण्यात यावी.

V. संवर्धन तंत्रज्ञान घटकांतर्गत उभारणी घटकांच्या बाबतीत फक्त अपूर्ण राहिलेल्या पाणलोट क्षेत्राची कामे घेता येतील. तथापि, जिरायती क्षेत्राच्याबाबतीत शेतकऱ्यांच्या विशिष्ट गरजा लक्षात घेवून मर्यादीत शेतकऱ्यांना अभियानांतर्गत ५०% एवढे अर्थसहाय देता येईल.

VI. सलग क्षेत्राचा उत्तम रीतीने विकास होण्याच्या दृष्टिने इतर कार्यक्रम/योजनांमधील उपक्रमांचा लाभ देण्यात यावा.

VII. शेतकऱ्यांना अतिरीक्त उत्पन्न मिळण्याच्या दृष्टिकोनातून तसेच वैविध्यपूर्ण (Diversified) शेती पद्धती विकसित करण्यासाठी शेतकऱ्यांना शेताच्या सीमेभोवती व शेततळ्यांच्या बांधावर झुडपे, झाडे, फळझाडे लावण्यास प्रवृत्त करावे.

VIII. रू.६०.४८ कोटी रकमेच्या कार्यक्रमास मान्यता देण्यात आली असली तरी, कार्यक्रमाची प्रत्यक्ष अंमलबजावणी करताना मंजूर अनुदानाच्या मर्यादेतच क्षेत्र/घटकांचा समावेश होईल, याबाबतची दक्षता घेण्यात यावी.

IX. कमीत कमी ५०% एवढा निधी अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांसाठी वापरण्यात यावा. ३०% निधी महिला लाभार्थ्यांसाठी वापरण्यात यावा.

X. अनुसुचित जाती व अनुसुचित जमातीच्या लाभार्थ्यांसाठी अनुक्रमे १६% व ८% एवढा निधी किंवा जिल्ह्यातील लोकसंखेच्या प्रमाणात वापरण्यात यावा.

XI. या कार्यक्रमाचे मुल्यमापन त्रयस्थ संस्थेकडुन (Third Party Evaluation) करुन घ्यावे.

XII. वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी ग्रामपंचायत/तालुका कार्यालये/पंचायत समिती/ जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी. तसेच ती यादी कृषि विभागाच्या वेबसाईटवर देखील अपलोड करण्यात यावी.

XIII. एकदा लाभ दिलेल्या लाभार्थ्यांना या कार्यक्रमांतर्गत पुन:श्च लाभ देण्यात येऊ नये.

XIV. कार्यक्रमाची प्रत्यक्ष अमंलबजावणी निधी उपलब्धतेनुसार करण्यात यावी.

XV. शेततळ्यांची कामे महात्मा गांधी रोजगार हमी योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांकडून महात्मा गांधी रोजगार हमी योजनेमधून करून घेण्यात यावीत. महात्मा गांधी रोजगार हमी योजनेंतर्गत पात्र लाभार्थी उपलब्ध झाले नाहीत तर इतर मजूरांकडून कामे करून घेण्यात यावीत. मजूर उपलब्ध होत नसतील तर तशा प्रकारचा संबंधित गावच्या व गावाच्या २ कि.मी. परिसरातील इतर गावाच्या ग्रामपंचायतीच्या ग्रामसभेचा ठराव करून घ्यावा व त्यानंतरच शेततळ्याची कामे मशीनद्वारे करून घेण्यात यावीत.

१६. प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

१७. योजनेचा सविस्तर त्रैमासिक प्रगती अहवाल पुढील त्रैमासिकाच्या पहिल्या महिन्यांच्या १० तारखेपर्यंत त्याचप्रमाणे वार्षिक प्रगती अहवाल आर्थिक वर्ष संपल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीत कृषि व सहकार विभाग, कृषि मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडे तसेच राज्य शासनाकडे पाठविण्यात यावा.

१८. कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथे नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या सदर घटकाच्या मार्गदर्शक सुचना तसेच उपरोक्त नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०५१७१९३४११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2015.09.05 17:22:25 +05'30'

( सु.सं.धपाटे )

उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि व पणन) यांचे खाजगी सचिव
२. मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
५. अ मु स (कृषि) यांचे स्विय सहाय्यक
६. कुलगुरु, (सर्व कृषि विद्यापिठे)
७. प्रधान सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. प्रधान सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. प्रधान सचिव (रोहयो व जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
११.आयुक्त (सहकार), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी, मुंबई.
१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
१४.जिल्हाधिकारी (सर्व)
१५.मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
१६.मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
१७.राष्ट्रीय कृषि संशोधन परिषद (ICAR)
१८. संशोधन संचालक, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी
१९.संशोधन संचालक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापिठ, परभणी
२०.संशोधन संचालक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापिठ,दापोली
२१.संशोधन संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापिठ, अकोला

२२.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२३.संचालक, महाराष्ट्र राज्य बीज प्रमाणीकरण यंत्रणा, अकोला
२४.संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि प्रशिक्षण संस्था, नागपुर
२५.संचालक, कृषि हवामान शास्त्र विभाग, पुणे
२६.भारतीय हवामान शास्त्र विभाग, पुणे
२७.विभाग प्रमुख, एकात्मिक जल व्यवस्थापन, महात्मा फुले कृषि विद्यापिठ, राहुरी
२८. विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, महात्मा फुले कृषि विद्यापिठ, राहुरी
२९.विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापिठ, परभणी
३०.विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापिठ, दापोली
३१.विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापिठ, अकोला
३२.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
३३.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
३४.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा)
३५.व्यवस्थापकीय संचालक, जिल्हा अग्रणी बँक (बँक ऑफ महाराष्ट्र, लोकमंगल, पुणे)
३६.सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/सर्व मंडळ कृषि अधिकारी
३७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
३९.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
४०.संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
४१.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
४२.उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/ अमरावती/नागपुर
४३.उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
४४.सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
४५.निवडनस्ती.